आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित "महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क (MAGNET) प्रकल्प" राबविण्याकरीता "राज्यस्तरीय प्रकल्प सुकाणू समिती" स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृपमं ०११८/प्र.क्र.१३/२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १९ ऑक्टोबर, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृपमं ०११८ /प्र.क्र. १३ /२१-स दि.१९.१०.२०१८ व दि.२०.१०.२०१८

२) शासन निर्णय सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृपमं ०११८ /प्र.क्र. १३ /२१-स दि.३०.०९.२०२०

**प्रस्तावना :-**

आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क प्रकल्प (Maharashtra Agribusiness Network -MAGNET) राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये ६ वर्षासाठी (सन २०२० ते २०२६ पर्यंत) राबविण्याचा निर्णय दि.२९/०७/२०२० रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत घेण्यात आला. त्यानुसार मॅग्नेट प्रकल्पाचा अंतिम आराखडा मंजूर करणे, प्रकल्प अंमलबजावणीवेळी प्रकल्प आराखड्यात आशियाई विकास बँकेच्या सहमतीने आवश्यकतेनुसार बदल करणे, प्रकल्प अंमलबजावणीमध्ये धोरणात्मक बदल करणे, प्रकल्पाचा आढावा घेणे, अंदाजपत्रक व प्रशासकीय बाबींना मान्यता व आवश्यकतेनुसार त्यामध्ये बदल करण्याचे अधिकार मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय सुकाणू समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

आशियाई विकास बँक (ADB) अर्थसहाय्यित महाराष्ट्र ॲग्रीबिझनेस नेटवर्क प्रकल्प (Maharashtra Agribusiness Network -MAGNET) राबविण्यासाठी व प्रकल्पाचे सनियंत्रण करण्यासाठी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे "राज्यस्तरीय सुकाणू समिती" स्थापन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | समिती सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (नियोजन), | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, | सदस्य |
| ५ | सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, | सदस्य |
| ६ | सचिव, महिला व बाल विकास विभाग, | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव (पणन) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सदस्य सचिव |

२. मॅग्नेट प्रकल्पाचा अंतिम आराखडा मंजूर करणे, प्रकल्प अंमलबजावणीवेळी प्रकल्प आराखड्यात आशियाई विकास बँकेच्या सहमतीने आवश्यकतेनुसार बदल करणे, प्रकल्पाच्या अंमलबजावणीमध्ये धोरणात्मक

बदल करणे, प्रकल्पाचा आढावा घेणे, अंदाजपत्रक व प्रशासकीय बाबींना मान्यता व आवश्यकतेनुसार त्यामध्ये बदल करण्याचे अधिकार सुकाणू समितीस असतील.

**३.** प्रकल्पाच्या वार्षिक कृती आराखड्यास, प्रत्येक वर्षी राज्यस्तरीय सुकाणू समितीची मान्यता देण्यात येईल व वार्षिक कृती आराखडा मंजूर झाल्यानंतर, प्रकल्प संचालक प्रकल्पाची प्रत्यक्ष अंमलबजावणी करतील. प्रकल्पाच्या प्रगतीचा सहामाही आढावा राज्यस्तरीय सुकाणू समितीमार्फत घेण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०१९१२२५२२१३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, postalCode=400032, street=MANTRALAYA , MUMBAI , serialNumber=8c5d0f275c3d9a21db07fecf7919c2d83796e88930d62d44e7a4a6d4cbee7e0e, ou=CO OPERATION MARKETING AND TEXTILE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KALU GONYA VALVI
Date: 2020.10.19 12:29:19 +05'30'

**( का. गो. वळवी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान सभा / परिषद, विधान भवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (पणन/वित्त/नियोजन/उद्योग/कृषि/महिला व बाल विकास), मंत्रालय, मुंबई
९. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
११. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
१२. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर
१३. सहसंचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष, ५वा मजला, नवीन प्रशासन भवन,मंत्रालयासमोर,मुंबई ३२.
१४. सर्व जिल्हा कोषागर अधिकारी
१५. निवासी लेखापरिक्षण अधिकारी, मुंबई
१६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१७. उप सचिव, वित्त विभाग (व्यय-२/ अर्थबळ), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१८. उप सचिव, नियोजन विभाग ( का-१४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
१९. अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७-स/रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२०. निवडनस्ती (२१-स).